**जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत मौजे ढाकेफळ ता. पैठण जि. औरंगाबाद या पुनर्वसित गावठाणातील पाणीपुरवठा योजनेच्या कामासाठी निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अर्थसं- २०२३/प्र.क्र.१८/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १४ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र. ५५०/र-१, दि. ०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र- २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि. १७/४/२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं -२०१३/१०३/प्र.क्र.६०/र-८, दि. २९/११/२०१३
५) लेखाधिकारी,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,औरंगाबाद यांचे पत्र क्र. लाक्षेविप्राऔ/लेखा-१/१४, दि. ३/१/२०२३

**प्रस्तावना-**

जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत मौजे ढाकेफळ ता. पैठण जि. औरंगाबाद या पुनर्वसित गावठाणातील पाणीपुरवठा योजनेच्या कामास संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या पाणीपुरवठा योजनेच्या कामाचे देयक अदा करण्यासाठी संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रान्वये निधी मागणी प्रस्ताव लेखाधिकारी, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद यांनी शासनास सादर केला आहे.

२. त्या अनुषंगाने प्रस्तावाधीन प्रगतीपथावरील पाणीपुरवठा योजनेच्या कामाचे देयक अदा करण्यासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत मौजे ढाकेफळ ता. पैठण जि. औरंगाबाद या पुनर्वसित गावठाणातील पाणीपुरवठा योजनेच्या कामासाठी एकूण रूपये १४,४१,०००/- निधी (रूपये चौदा लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) एवढा निधी सन २०२२-२०२३ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत मौजे ढाकेफळ ता. पैठण जि. औरंगाबाद या पुनर्वसित गावठाणातील

पाणीपुरवठा योजनेच्या कामाचे देयक अदा करण्यासाठी पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये १४,४१,०००/- निधी (रूपये चौदा लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) "मागणी क्रमांक सी-१०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१ एच-७२७)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे-

(रक्कम रूपयात)

| अ. क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता दिलेली रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | आता वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | ढाकेफळ, ता. पैठण जि. औरंगाबाद | पाणीपुरवठा योजना | १,१९,२०,६००/- | निरंक | १४,४१,०००/- |
| | | | एकूण- | | **१४,४१,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद यांनी नागरी सुविधा व तद्नुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे विभाग, औरंगाबाद यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, औरंगाबाद तसेच जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. तसेच सदर निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२०२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३१४१७२२१९५३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7,
pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9,
serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2023.03.14 17:26:45 +05'30'

**( संजय जगताप )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

२. उप आयुक्त (पुनर्वसन), औरंगाबाद
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, औरंगाबाद
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद
५. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, औरंगाबाद
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०. वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
११. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय,मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.